अंतिम सुधारीत अनुदान २००९-२०१०
**मागणी क्र.वाय-०७, ७६१०-शासकीय कर्मचारी इत्यादिंना कर्जे (योजनेतर)**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,**
**शासन निर्णय क्र.बीयुडी-१००९/प्र.क्र.२०७/पापु-१५,**
**मंत्रालय, मुंबई ४०००३२**
**दिनांक - ३१ मार्च,२०१०**

**वाचा**-१.पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय समक्रमांक दि.२४ जुलै,२००९, दि.३१ ऑक्टोबर,२००९ व दि.७ डिसेंबर,२००९

२. शासन परिपत्रक , वित्त विभाग, क्र.पूरक-२०.१०/प्र.क्र.६८/अर्थसंकल्प-३ दि.३० मार्च,२०१०

३. सहायक संचालक (मवि व लेसे), भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, यांचे पत्र क्र.संचा/लेखा/समर्पित अनुदान/२५४/१० दि.३१ मार्च,२०१०

**प्रस्तावनाः-**

सन २००९-२०१० या आर्थिक वर्षात पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (खुद्द) व विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणे अंतर्गत कार्यरत शासकीय कर्मचा-यांना कर्जे इत्यादी वरील खर्च भागविण्यासाठी मागणी क्र.वाय-७, ७६१०-शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्जे या प्रधान लेखाशीर्षाखाली सुधारीत अंदाजात एकूण रु.१३२.२३ लक्ष मंजूर करण्यात आले आहेत. पैकी भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेतील कर्मचा-यांना कर्जे इ.वरील खर्च भागविण्यासाठी संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये रुपये १०५.५२ लक्ष इतका निधी संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना मंजूर व मुक्त करण्यात आलेला आहे.

संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये मागणी क्र.वाय-७, ७६१०-शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्जे या प्रधान लेखाशीर्षाखाली रु.२४.१०५ लक्ष अनुदान शासनास समर्पित केले आहे.

**शासन निर्णयः-**

सन २००९-२०१० या आर्थिक वर्षात संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणे अंतर्गत कार्यरत शासकीय कर्मचा-यांना कर्जे इत्यादी वरील खर्च भागविण्यासाठी मागणी क्र.वाय-७, ७६१०-शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्जे या प्रधान लेखाशीर्षाखाली मंजूर व मुक्त केलेल्या रु.१०५.५२ लक्ष अनुदानापैकी त्यांनी संगणक वितरण प्रणालीद्वारे ( BDS द्वारे Online समर्पण ) शासनास समर्पित केलेले **रु.२४.१०५ लक्ष अनदानाचे समर्पण स्वीकारण्यात येत आहे.**

समर्पित अनुदान वजा जाता, **संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांना भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेंतर्गत कार्यरत शासकीय कर्मचा-यांना कर्जे इत्यादीवरील खर्च भागविण्यासाठी** खालील विवरणपत्रातील स्तंभ- ५ मध्ये दर्शविल्याप्रमाणे **रु. ८१.४१५ लक्ष** (रुपये ऐक्याऐंशी लक्ष **एकेचाळीस हजार पाचशे फक्त) एवढे अंतिम सुधारीत अनुदान या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात येत आहे.**

(रु. लक्ष)

| अ.क्र. | उपशिर्ष/गौणशिर्ष | सन २००९-१० या आर्थिक वर्षात मंजूर व मुक्त केलेले अनुदान | समर्पित अनुदान | **लेखाशीर्ष ७६१० खाली सन २००९-१० या आर्थिक वर्षात मंजूर अंतिम सुधारित अनुदान** |
|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. |
| १. | २०१ घरबांधणी अग्रिम (७६१० १५८४) | ८६.४७ | २०.७१ | **६५.७६** |
| २. | २०२ मोटार वाहनांच्या खरेदीसाठी अग्रिम (७६१० १५९३) | ९.२३५ | ०.००५ | **९.२३** |
| ३. | २०३ इतर वाहनांच्या खरेदीसाठी अग्रीम (७६१० १६०१) | ०.२२५ | ०.२० | **०.०२५** |
| ४. | २०४ वैयक्तिक संगणक खरेदीसाठी अग्रिम (७६१० १९४२) | ९.५९ | ३.१९ | **६.४०** |
|  | **एकूण दत्तमत** | १०५.५२ | २४.१०५ | **८१.४१५** |

२. उपरोक्त बाबी वरील खर्च "मागणी क्र.वाय-७, ७६१०-शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्जे " या प्रधान लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra. gov.in** या बेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००४१५१९४३४७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(श.वि. दुर्वे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:

१. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
२. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, सर्व
३. वरिष्ठ भूवैज्ञानिक , भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,सर्व
४. उप अभियंता (यां), भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,सर्व
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई/२ नागपूर (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता)
६. वित्त विभाग, अर्थसंकल्प-१६ ( २ प्रती)
७. कक्ष अधिकारी/ लेखा अधिकारी,पापु-०४, पापु-०७, पापु-२०
८. निवड नस्ती पापु-१५